राज्यातील पोलीस जनता संपर्क
समित्यांची पुनर्रचना

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्र.पीपीसी ०५०१/प्र.क्र.२३/पोल-३,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२. दिनांक:१ जानेवारी,२००२

वाचा:- शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीपीसी ३११०/प्र.क्र.१४७/पोल-३,
दि.२५ ऑक्टोबर, १९९०.

**शासन निर्णय:-** शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीपीसी ३११०/प्र.क्र.१४७/पोल-३, दि.२५ ऑक्टोबर, १९९० अन्वये दि.१.१.१९९१ पासून राज्यातील सर्व जिल्हयात व सर्व पोलीस आयुक्तालयांच्या क्षेत्रात पोलीस जनता संपर्क समितीची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने अता, वर नमूद केलेला दि.२५ ऑक्टोबर, १९९० चा शासन निर्णय रद्द करुन, जिल्हातील प्रत्येक पोलीस उपविभागीय अधिकारी स्तरावर व पोलीस आयुक्तालयाच्या प्रत्येक परिमंडळ स्तरावर खाली नमूद केल्याप्रमाणे पोलीस जनता संपर्क समित्या स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

१) जिल्हयातील प्रत्येक उपविभागीय पोलीस अधिकारी स्तरावर आणि पोलीस आयुक्तालयाच्या प्रत्येक परिमंडळात एक एक पोलीस जनता संपर्क समिती स्थापन करण्यात यावी.

२) पोलीस जनता संपर्क समितीवर किमान १५ व कमाल २० अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात यावी.

३) सर्व परिक्षेत्रिय विशेष पोलीस महानिरीक्षक यांनी त्यांच्या अधिपत्याखालील जिल्हया अंतर्गत व पोलीस आयुक्तांनी आयुक्तालया अंतर्गत जनता संपर्क समितीवर नियुक्त करावयाच्या अशासकीय सदस्यांबाबत संबंधित पालक मंत्री यांच्या संमतीने जिल्हावार एकत्रित प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

४) अशासकीय सदस्यांची शिफारस करतांना खालील व्यक्तींना प्रतिनिधीत्व देण्यात यावे :-

१) सामाजिक कार्य, संशोधन अथवा इतर महत्वाच्या विभागातील व्यक्ती.
२) नोंदणीकृत वैद्यकिय व्यवसायिक संघटनेचे प्रतिनिधी.
३) बार असोशिएशनचे प्रतिनिधी,
४) पर्यावरण तज्ञ अथवा पर्यावरणवादी संघटनेचे (नोंदणीकृत) प्रतिनिधी.
५) नगरपालिका/जिल्हा परिषदेचे प्रतिनिधी.
६) खेळांच्या संस्थांचे प्रतिनिधी,
७) कामगार संस्थांचे प्रतिनिधी.
८) व्यापारी वर्गाचे प्रतिनिधी.
९) सामाजिक संस्थांचे प्रतिनिधी.(अंधश्रध्दा निर्मूलन,जाती निर्मुलन इ.)
नोंदणीकृत -अशासकिय सामाजिक/सांस्कृतिक संस्था)
दारुबंदी ,नशा उत्तेजन विरोधी काम करणाऱ्या संस्था.

GR - 200201221356480000-0200

१०) युवा कार्यकर्त्यांचे प्रतिनिधी,

११) शैक्षणिक क्षेत्रातील प्रतिनिधी,( प्राचार्य,प्राध्यापक इ.)

१२) महिला मंडळ अथवा वनिता समाज इत्यादी स्त्रियांच्या संस्थांचे महिला प्रतिनिधी,

१३) औद्योगिक संस्थांचे प्रतिनिधी,

१४) या शिवाय इतर विशेष व्यक्ती.

५) जिल्हयातील/आयुक्तालयातील सर्व विभागाकरिता स्थापन करावयाच्या पोलीस जनता संपर्क समित्यावरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीचे अंतिम आदेश शासनाच्या मान्यतेनंतर संबंधीत पोलीस अधीक्षक व पोलीस आयुक्त यांच्या मार्फत निर्गमित करण्यात येतील.अशासकीय सदस्यांची नियुक्ती केव्हाही रद्द करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

६) **पोलीस जनता संपर्क समित्यांच्या कक्षेतील विषय:-**

१) गुन्हयाची घटना व गुन्हा प्रतिबंधक उपाय योजनेबाबत सहकार्य,

२) स्त्रियांवरील अत्याचाराचे गुन्हे/बाल गुन्हेगारीच्या घटना आणि जुगार व अंमली पदार्थ यावर प्रतिबंधक उपाय योजनेसंबंधी सहकार्य,

३) पोलीस व जनता यांचे परस्पर सामाजिक संबंध,

४) कायदा व सुव्यवस्था राखण्याबाबत उपाय योजना,

५) गणेशोत्सव, मोहरम, दसरा वगैरे सारख्या धार्मिक कार्यक्रमाचे वेळी करण्यात येणारी उपाय योजना.

७) जिल्हयातील उपविभागीय पोलीस अधिकारी यांच्या कार्यकक्षेतील क्षेत्रातून व पोलीस आयुक्तालयातील परिक्षेत्र (झोन) मधून निवडून आलेले लोकसभा सदस्य, राज्यसभा सदस्य, विधानसभा सदस्य, विधान परिषद सदस्य हे संबंधीत पोलीस जनता संपर्क समितीचे पदसिध्द विशेष निमंत्रित सदस्य म्हणून राहतील.

८) **समितीचा कालावधी :-**

समितीचा कालावधी ५ वर्षाचा राहील व त्या कालावधीनंतर जर समितीची पुनर्रचना झाली नाही तरी तीच समिती अस्तित्वात आहे असे समजण्यात यावे.

९) प्रत्येक पोलीस जनता संपर्क समितीवर खालील शासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात यावी :-

१) जिल्हयातील प्रत्येक उपविभागाकरिता स्थापन केलेल्या पोलीस जनता संपर्क समितीचे संबंधीत उपविभागीय पोलीस अधिकारी हे अध्यक्ष, व पोलीस उप विभागातील सर्वात जेष्ठ पोलीस उपनिरीक्षक हे सचिव असतील.

२) प्रत्येक पोलीस आयुक्तालयातील प्रत्येक परिमंडळात पोलीस जनता संपर्क समितीवर संबंधित पोलीस विभागाचे पोलीस उपआयुक्त हे अध्यक्ष त्या पोलीस विभागातील सहायक पोलीस आयुक्त किंवा सर्वात जेष्ठ पोलीस निरीक्षक हे सचिव असतील.

GR-200201221138648000-0200

१०) **पोलीस जनता संपर्क समितीच्या बैठका :-**

प्रत्येक पोलीस जनता संपर्क समितीची बैठक सर्वसाधारणपणे प्रत्येक महिन्यात एकदा घेण्यात यावी व बैठकीचा कार्यवृत्तांत बैठक झाल्यापासून १० दिवसात संबंधित पोलीस आयुक्त व जिल्हा दंडाधिकारी तसेच जिल्हा पोलीस अधीक्षक यांच्याकडे पाठविण्यात यावा. प्रत्येक सहामाहीत झालेल्या प्रत्येक पोलीस जनता संपर्क समितीच्या बैठकामधील कार्यवृत्तांतावर करण्यात आलेल्या कार्यवाहीचा एकत्रित अहवाल संबंधित पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधीक्षक यांनी संबंधित विशेष पोलीस महानिरीक्षक, जिल्हादंडाधिकारी, महासंचालक व पोलीस महानिरीक्षक आणि गृह विभाग यांच्याकडे प्रत्येक सहामाहीनंतरच्या पहिल्या पंधरवडयात निश्चितपणे सादर करावा. पोलीस जनता संपर्क समितीच्या बैठकांना उपस्थित राहणा-या अशासकीय सदस्यांना कोणतेही मानधन व बैठकभत्ता देय होणार नाही.

११) हा निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६१५१ /साप्रवि-१८/दि.११.७.२००१ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सं. शं. इंगळे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
२) उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक ,
४) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक,
५) प्रधान सचिव, गृह (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक,
६) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक, (परिक्षेत्र)
८) पोलीस आयुक्त बृहन्मुंबई
९) सर्व जिल्हादंडाधिकारी,
१०) सर्व पोलीस आयुक्त,
११) सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक,
१२) गृह विभागातील सर्व कार्यासने,
१३) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग,
१४) निवडनस्ती, पोल-३.

GR-200201221336480000-0200